**रजेगाव काटी उपसा सिंचन**
**योजना ता.जि.गोंदीया**
**व्दितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र. सुप्रमा/२०१०/८८४/(३१३/१०)/म.प्र**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : ३१/ ०३/२०११**

**पहावे :-** **१) शासन निर्णय क्रं. रजेगाव-१०९८/७८/(१८/९८)ज.सं.अ./मंत्रलाय/मुंबई, दि. ३०/९/१९९९**
**२) कार्यकारी संचालक वि.पा.वि.म./कातां/१/१६५४/प्रथमसुप्रमा / रजेगाव काटी/२००८ , दि.३१/३/२००८**

**प्रस्तावना :-**

रजेगाव काटी उपसा सिंचन योजना ता.व जि.गोंदीया या योजनेस शासन निर्णय क्रं. रजेगाव काटी/१०९८/७८/(१८/९८)/ज.सं.अ./मंत्रालय, मुंबई, दि. ३०/९/१९९९ अन्वये (दरसुची १९९६-९७ वर आधारीत) रु.२३३७.९५९ लक्ष (रु.तेवीस कोटी सदोतीस लक्ष पंच्याण्णव हजार नऊशे फक्त) एवढया रकमेस मुळ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. मध्यंतरीच्या काळात दरसुची मुळे झालेली वाढ, भुसंपादन खर्चातील वाढ, तांत्रिक सुधारणा व नविन तरतुदी इत्यादी कारणांमुळे प्रकल्पाच्या किंमती मध्ये वाढ झाली. यासाठी कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांनी त्यांचे पत्र क्र. वि.पा.वि.म./ कातां/१/१६५४/प्रथम सुप्रमा/ रजेगाव काटी/२००८, दि. ३१/३/२००८ अन्वये (दरसुची २००५-०६ वर आधारीत) रु. ४१७७.८१८ लक्ष (रुपये एकेचाळीस कोटी सत्त्याहत्तर लक्ष एक्यांअंशी हजार आठशे फक्त) एवढया रकमेस प्रथम सुधारीत मान्यता प्रदान करण्यात आली होती. तद्नंतर ते आतापर्यंतच्या काळात दरसुची मुळें झालेली वाढ, भुसंपादन किंमतीमुळे झालेली वाढ व अनुषंगिक खर्चात झालेली वाढ इत्यादी बाबी मुळे प्रकल्पाच्या किंमती मध्ये वाढ झाली. यासाठी कार्यकारी संचालक यांनी त्यांचे पत्र क्र. ६६६१/वि.पा.वि.म./का.तां/१/रजेगाव काटी/व्दितीय सु.प्र.मा./२०१०, दि. २५/१०/२०१०अन्वये प्रकल्पाचा व्दितीय सुधारीत प्रशासकीय मान्यतेचा अहवाल मंजुरीसाठी सादर केलेला होता. त्यास मान्यता देण्याचे शासनाचे विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

शासनाकडून आता या निर्णयाव्दारे गोंदीया जिल्हयातील गोंदीया तालुक्यातील रजेगाव काटी उपसा सिंचन प्रकल्पाच्या कामासाठी सन २०१०-११ च्या दरसुचीवर आधारित रु. ८७४३.०९५ लक्ष (रुपये सत्यांशी कोटी त्रेचाळीसलक्ष नऊ हजार पाचशे फक्त) एवढया रकमेस व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यांत येत आहे. त्यापैकी रु.७०७६.९९२ लक्ष (रुपये सत्तर कोटी शहात्तर लक्ष नव्यान्नव हजार दोनशे फक्त)

कामाप्रित्यर्थ व रु. १६६६.००८ लक्ष (रुपये सोळा कोटी सहासष्ट लक्ष आठशे फक्त) आनुषंगिक खर्च आहे. सोबत सहपत्र १ मध्ये सुधारित उपशीर्षवार तरतूद व सहपत्र २ मध्ये सुधारीत सर्वसाधारण गोषवारा दिला आहे.

१) सदर प्रकल्पाचे काम नियोजीत वेळेत व सुधारीत प्रशासकीय प्रस्तावाच्या तरतुदीच्या मर्यादेत पूर्ण करणेत यावे.

२) या योजनेस प्रदान केलेली व्दितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता मध्यम प्रकल्प कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये अ.क्र.१२ (२०१०-११) वर नोंदविण्यात आली आहे.

३) या प्रकल्पामुळे गोंदीया जिल्हयातील गोंदीया तालुक्यातील नक्षलग्रस्त भागातील ३०४० हेक्टर क्षेत्रास सिंचनाचा लाभ होणार आहे. प्रकल्पाचे लाभव्यय परिमाण २.२५६ आहे.

४) या योजनेच्या कामावर होणारा खर्च लेखाशीर्ष आय-५,४७०१ मोठे व मध्यम प्रकल्प यावरील भांडवली खर्च ८० सर्वसाधारण, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुक (०२) (०२) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर या महामंडळास भाग भांडवली अंशदान (योजना अंतर्गत) (४७०१ एच ६६५) मध्यम प्रकल्प याखाली खर्ची टाकावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५) प्रकल्पांची सुधारित किंमत पुढील येणाऱ्या अधिवेशनात विधानमंडळाच्या निदर्शनास लाक्षणिक पुरकमागणी व्दारे आणण्यांत येईल.

हा निर्णय शासन पाटबंधारे विभाग निर्णय क्र. संकीर्ण १०९९/(१२६/९९)/मो.प्र (प्र.), दिनांक १८/५/१९९९ च्या आदेशातील तरतुदीनुसार आंतरवित्त सल्लागार तथा सहसचिव यांनी दिलेल्या सहमती नुसार निर्गमित करणेत येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

**(म.गु.वानखेडे)**
**शासनाचे अवर सचिव**

सहपत्र- वरीलप्रमाणे १ व २

प्रत सहपत्रासह अग्रेषित :-

महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
वित्त विभाग (व्यय-१२),(अर्थ-२),(अर्थ-१०),(व्यय ६ अ), मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर
आंतरवित्त सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता,गोसीखुर्द उपसा सिंचन मंडळ, अंबाडी (भंडारा)
कार्यकारी अभियंता, मध्यम प्रकल्प विभाग, गोंदीया

स्वीय सहायक, मा.मंत्री (जलसंपदा) (कृष्णा खोरे पाटबंधारे विकास महामंडळ) वगळून )मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मा.राज्यमंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (जलसंपदा ), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (लाभक्षेत्र विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता (कृपातंल) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक,, उप सचिव (मोप्र-२), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासने-जसंअ, निवस-१,अर्थ-१, पाटबंधारे विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासन म.प्र.संग्रहार्थ
निवड धारिका

**तक्ता क्रमांक १**

**रजेगाव काटी उपसा सिंचन प्रकल्प ता.जि.गोंदीया**
**शासन निर्णय क्र. सुप्रमा/२०१०/८८४/(३१३/१०)म.प्र.**
**दि. ३१ / ०३ /२०११ चे सहपत्र**

**द्वितीय सुधारीत अंदाजपत्रक उपशीर्षवार तरतुदी**

| अ.क्र. | उपशीर्ष | सुधारित प्रस्तावित अंदाजपत्रक (रुपये लक्ष) |
|---|---|---|
| १ | | ३ |
| १) | " अे " प्राथमिक सर्वेक्षण | १४.२८ |
| २) | " बी " भूसंपादन | १०७.९३४ |
| ३) | " सी " कामे | २९१४.९८ |
| ४) | " डी " विमोचक | - |
| ५) | " ई " फॉल्स | - |
| ६) | " एफ " आर.एच.टी. कामे | - |
| ७) | " जी " ब्रिजेस | - |
| ८) | " एच " एस्केप | - |
| ९) | " के " इमारती | ६.७१३ |
| १०) | " एल " मातीकाम | - |
| ११) | " एम " वृक्षारोपण | १.००१ |
| १२) | " ओ " संकिर्ण | ८.२०५ |
| १३) | " पी " देखभाल व दुरुस्ती | २२.८०७ |
| १४) | " क्यू " हत्यारे व संयत्रे | ४८.६८० |
| १५) | " आर " दळणवळण | ६.४९८ |
| १६) | " वाय " लॉसेस | ५.७७९ |
| १७) | मुख्य कालवा | -----७५०.१६५ |
| १८) | वितरीका भाग-३ | ३१८९.९८० |
| | एकूण कामाप्रित्यर्थ | ७०७६.९९२ |
| | आस्थापना व अनुषंगिक खर्च | १६६६.००८ |
| | एकूण | ८७४३.०९५ |

**तक्ता क्रमांक २**

**रजेगाव काटी उपसा सिंचन प्रकल्प ता.जि.गोंदीया**
**शासन निर्णय क्र. सुप्रमा/२०१०/८८४/(३१३/१०)म.प्र.**
**दि. ३१ / ०३ /२०११ चे सहपत्र**

**द्वितीय अंदाजपत्रक सर्वसाधारण संकलित गोषवारा**

| अ.क्र. | विवरण | रक्कम (रुपये लक्ष) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| (अ) | **प्रत्यक्ष खर्च**<br>१) शीर्षकामे<br>२) कालवे<br>३) वितरीका | ३१३६.८५७<br>७५०.१६५<br>३१८९.९८० |
| | **एकूण (अ)** | ७०७६.९९२ |
| (ब) | **अधिक**<br>१) आस्थापना खर्च (ब-जमिन वगळून)२० टक्के<br>२) हत्यारे व अवजारे ३.५४ टक्के दराने (ब-जमीन क्यू हत्यारे वगळून<br>३) लिव्ह व पेन्शनरी चार्जेस ३.५ टक्के (आस्थापना खर्चावर)<br>४) संग्रहावरील तूट ०.२५ टक्के | <br>१३०६.५५८<br>२२८.६४<br><br>१६.१७ |
| | **एकूण (ब)(३ + ४ + ५ + ६)** | १५५१.३६८ |
| | **एकूण (अ+ब)** | ८६२८.३६ |
| (क) | **वजाती**<br>१) विशेष टी ॲंड पी वाहनावर (७५ टक्के) वैयक्तीक वहाने वगळून येणा-या रकमेवर<br>२) वैयक्तिक वाहनावर २० टक्के दराने<br>३) तात्पुरत्या इमारतीच्या किंमतीवर १५ टक्के दराने | <br>१२.१६८<br><br><br>१.००७ |
| | **एकूण वजाती** | (-)१३.१७५ |
| | **एकूण प्रत्यक्ष खर्च (अ+ब) - क** | ८६१५.१८५ |
| (ड) | **अप्रत्यक्ष खर्च**<br>१) वाहीतीलायक क्षेत्राच्या ५.५० टक्के दराने जमीन महसूल<br>२) लेखा व परीक्षण खर्च १.०० टक्के<br>३) सचिवालय चार्जेस<br>(आस्थापनेच्या खर्चावर ०.५० टक्के दराने) | <br>२९.९३<br>६५.३२<br>३२.८६ |
| | **एकूण अप्रत्यक्ष खर्च** | १२८.११ |
| | **प्रकल्पाची एकूण किंमत** | ८७४३.०९५ |